**महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५. नदी-खोरे अभिकरणासाठी विशेष निमंत्रित (अर्थशास्त्र) म्हणून नेमणूक करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मजनिप्रा २०१४/(६०/१४)/जसं(आस्था)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

तारीख: ११ सप्टेंबर, २०१४

वाचा

१) **शासन निर्णय क्रमांकः नदीजो-२००७/(१७७/०७)/जसंअ दि. १३/०३/२००८**

२) **शासन निर्णय क्रमांकः नदीजो -२०११/(८/११)/जसं(आस्था), दि.१०.०५.२०११**

३) **शासन निर्णय क्रमांकः नदीजो -२०११/(०८/११)/जसं(आस्था), दि.०१.१०.२०११**

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्यामधील जलसंपत्तीचे विनियमन करण्याकरिता, जलसंपत्तीचे कुशल समन्याय व टिकाऊ व्यवस्थापन, वाटप व वापर सुकर करण्याकरिता आणि त्यांची सुनिश्चिती करण्याकरिता कृषी विषयक, औद्योगिक, पिण्याच्या व इतर प्रयोजनांसाठी वापरावयाच्या पाण्याचे दर निश्चित करण्याकरिता महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाची स्थापना करण्यासाठी आणि त्याच्याशी संबधित किंवा तद्नुषंगिक बाबींकरिता तरतुद करण्यासाठी सन २००५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-१८ राजपत्रात अधिसूचित करण्यात आला आहे. या अधिनियमातील कलम- ४(१) (घ) मध्ये पुढील तरतुद करण्यात आलेली आहे.

" प्राधिकरणाला धोरणात्मक बाबींवर निर्णय घेण्यास सहाय्य करण्याकरिता प्रत्येक नदी-खोरे अभिकरणाच्या क्षेत्रातून एक याप्रमाणे विहीत केल्यानुसार पाच विशेष निमंत्रित जे अभियांत्रिकी, शेती, पिण्याचे पाणी, उद्योग, कायदा, अर्थशास्त्र, वाणिज्य, वित्तव्यवस्था किंवा व्यवस्थापन यांचेशी संबंधित समस्यांचे पुरेसे ज्ञान, अनुभव असलेले किंवा त्या संबंधातील क्षमता शाबीत केली असेल असे असतील." सन २००५ च्या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-१८ च्या कलम २ (प) नुसार 'नदी खोरे अभिकरण' याचा अर्थ नदी खो-यामध्ये कार्यरत असलेल्या पाच पाटबंधारे विकास महामंडळांपैकी कोणतेही एक असा आहे. त्यानुसार महाराष्ट्रातील ५ नदी-खोरे अभिकरणामधून विशेष निमंत्रितांची नियुक्ती उपरोक्त संदर्भीय

शासन निर्णय क्र.१ नुसार यापूर्वी करण्यात आलेली होती. शासन निर्णय दि. ०१/१०/२०११ अन्वये नियुक्त करण्यात आलेल्या विशेष निमंत्रितांचा कालावधी दि.३०/०९/२०१४ रोजी संपुष्टात येणार असल्यामुळे नवीन विशेष निमंत्रितांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

प्रत्येक नदी-खोरे अभिकरणांमधुन एक अशा एकुण ५ विशेष, निमंत्रितांना महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणावर विशेष निमंत्रित नियुक्त करणे अभिप्रेत आहे. त्याअनुषंगाने कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे या महामंडळावर श्री.ए.के.डी.जाधव यांची विशेष निमंत्रित (अर्थशास्त्र) म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

सदर विशेष निमंत्रितांचा कालावधी दि.०१.१०.२०१४ पासून तीन वर्षाचा म्हणजे दि.३०.०९.२०१७ पर्यंत असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१२१८२०५६९३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Govindrao Mandade

Digitally signed by Pramod Govindrao Mandade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pramod Govindrao Mandade
Date: 2014.09.12 18:16:02 +05'30'

**( प्र.गो.मांदाडे )**

उप सचिव

प्रत,

१) मा मंत्री, जलसंपदा (कृखोपाम वगळून) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

२) मा मंत्री, जलसंपदा (कृखोपाम) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

३) मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

४) मा.प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

५) मा. प्रधान सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.

६) प्रधान सचिव ,पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) प्रधान सचिव, जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) प्रधान सचिव, ऊर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) प्रधान सचिव ,कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.

१२) सचिव , महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.

१३) श्री.ए.के.डी.जाधव, ४०९, शलाका, महर्षी कर्वे रोड, कुपरेज, मुंबई - ४०० ०२१.

१४) जसं (आस्था) कार्यासन संग्रहार्थ.